शैक्षणिक वर्ष २००९-१०
अस्तित्वात असलेल्या महाविद्यालयात
नवीन विद्याशाखांना मंजूरी (तिसरी यादी)

**महाराष्ट्र शासन**
**उच्च व तंत्र शिक्षण विभाग**
शासन आदेश क्रमांक एनजीसी २००९/(१६९/०९)/मशि-४
मंत्रालय विस्तार भवन, मुंबई ४०० ०३२
दिनांक : २८ ऑगस्ट , २००९

पहा:-१) शासन निर्णय क्रमांक-एनजीसी२००९ / (३३/०९) / मशि-३,
दि.१८.०२.२००९ (Task Force)
२) संचालक, उच्च शिक्षण यांचे पत्र क्र. एनजीसी / ०९-१० /नवि महा अतु / मान्यता /
मवि २-३, ११६९, दि. २८.०५.२००९

## शासन आदेश

महाराष्ट्र विद्यापीठ अधिनियम, १९९४ मधील कलम ८२(४) नुसार राज्यातील विद्यापीठांनी शासनाकडे अस्तित्वात असलेल्या महाविद्यालयात नवीन विद्याशाखांना मान्यतेसाठी प्रस्ताव सादर करावयाचे असतात, त्यानुसार शैक्षणिक वर्ष २००९-१० साठी राज्यातील विद्यापीठांकडून प्राप्त झालेल्या प्रस्तावांची शासन निर्णय क्रमांक-एनजीसी२००९/ (३३/०९) / मशि-३, दि.१८.०२.२००९ अन्वये स्थापित कृतिसमितीद्वारे छाननी करण्यात आली. कृती समितीचे अभिप्राय / शिफारशी व विद्यापीठाच्या शिफारशी विचारात घेऊन महाराष्ट्र विद्यापीठ अधिनियम १९९४ मधील कलम ८२(५) व ८३(५) अन्वये शासनास प्राप्त अधिकारानुसार अस्तित्वात असलेल्या महाविद्यालयात पुढील विवरणात नमूद केल्यानुसार नवीन विद्याशाखांना खालील अटी व शर्ती च्या अधिन राहून कायम विना अनुदान तत्वावर मंजूरी देण्यात येत आहे.

| अ.क्र. | महाविद्यालयाचे नाव | विद्याशाखा |
|---|---|---|
| संत गाडगेबाबा अमरावती विद्यापीठ, अमरावती | | |
| १ | सर्च कॉलेज ऑफ टैक्नीकल एज्युकेशन, यवतमाळ, ता. जि. यवतमाळ | बी.बी.ए. |
| डॉ. बाबासाहेब आंबेडकर मराठवाडा विद्यापीठ, औरंगाबाद | | |
| २ | स्व. ॲड. एस.डी. देशमुख संगणकशास्त्र व व्यवस्थापनशास्त्र महाविद्यालय, भोकरदन, जिल्हा जालना | बी.बी.ए.<br>बी.सी.एस.<br>बी.एस्सी. (आय.टी.)<br>बी.एस्सी. (संगणकशास्त्र)<br>एम.एस्सी. (संगणकशास्त्र) |
| ३ | जीवनदीप कला, वाणिज्य व विज्ञान महाविद्यालय, पिंपळनेर, जिल्हा बीड | बी.एस्सी. संगणकशास्त्र<br>बी.सी.ए. |

| | | |
|---|---|---|
| ४ | संत रामदास कला वाणिज्य व विज्ञान महाविद्यालय, घनसावंगी, ता. घनसावंगी, जिल्हा जालना | बी.सी.ए.<br>एम कॉम.,<br>एम. ए. (मराठी) |
| राष्ट्रसंत तुकडोजी महाराज नागपूर विद्यापीठ, नागपूर | | |
| ५ | इंदिरा गांधी कॉलेज ऑफ सायन्स ॲन्ड मॅनेजमेंट, चंद्रपूर, जि. चंद्रपूर | **समाजविज्ञान विद्याशाखा**<br>१. बॅचलर ऑफ लायब्ररी ॲन्ड इन्फॉरमेशन सायन्स (बी.लिब)<br>२. मास्टर ऑफ लायब्ररी ॲन्ड इन्फॉरमेशन सायन्स (एम.लिब.) |
| ६ | श्री. व्ही.के. पांडे कॉलेज ऑफ सायन्स ॲन्ड मॅनेजमेंट, हिंगणघाट, जि. वर्धा | **समाजविज्ञान विद्याशाखा**<br>१. बॅचलर ऑफ लायब्ररी ॲन्ड इन्फॉरमेशन सायन्स (बी.लिब)<br>२. मास्टर ऑफ लायब्ररी ॲन्ड इन्फॉरमेशन सायन्स (एम.लिब.) |
| शिवाजी विद्यापीठ, कोल्हापूर | | |
| ७ | वरिष्ठ कला महाविद्यालय, कळे, ता. पन्हाळा, जिल्हा कोल्हापूर | बी. कॉम.<br>बी. एस्सी. |
| पुणे विद्यापीठ, पुणे | | |
| ८ | नॉर्थ स्टार कॉलेज ऑफ आटर्स सायन्स ॲण्ड कॉमर्स, वडगांव गुप्ता, ता.जि. अहमदनगर | वाणिज्य-बी.बी.ए<br>विज्ञान-बी.सी.ए |

**अटी व शर्ती:-**

१. अस्तित्वात असलेल्या महाविद्यालयात नवीन विद्याशाखांना मंजूर करण्यात आलेल्या आहेत, त्या महाविद्यालयांने त्यांच्या विभागीय सहसंचालकांकडे ते भविष्यात कोणत्याही परिस्थितीत अनुदानाची मागणी करणार नाहीत असे हमीपत्र रु. १००/- च्या नॉन ज्युडीशियल स्टँप पेपरवर सादर करावे.
२. संबंधित विभागीय सहसंचालकांचे हमीपत्र सादर केल्याविषयीचे प्रमाणपत्र प्राप्त झाल्याशिवाय विद्यापीठांने संलग्नतेची प्रक्रिया सुरु करु नये.
३. विद्यापीठाने विहित केलेल्या निकषानुसार व विद्यापीठ अनुदान आयोगाने विहित केलेल्या शैक्षणिक पात्रतेनुसार महाविद्यालयांनी, अध्यापक वर्ग/ कर्मचारी वर्ग नेमणे आवश्यक असून इतर सर्व आवश्यक पायाभूत सोयी उपलब्ध कराव्यात व त्याची खात्री विभागीय सहसंचालकानी करावी व तद्नंतरच उपरोक्त अट क्रमांक २ मधील प्रमाणपत्र विद्यापीठास द्यावे.
४. महाविद्यालयांने कोणत्याही परिस्थितीत मंजूर प्रवेश क्षमतेपेक्षा जास्त प्रवेश देऊ नयेत.

५. नवीन विद्याशाखा मंजूर करण्यात आलेल्या महाविद्यालयांनी सन २००९-१० व २०१०-११ मध्ये NAAC ॲक्रीडीएशन प्राप्त करुन घ्यावे व ते या कालावधीत न मिळविल्यास सदर मान्यता आपोआप रद्द होईल.

६. महाराष्ट्र विद्यापीठ कायदा १९९४ मधील कलम ८२ (५) व ८३(५) नुसार ही मान्यता देण्यात येत आहे.

२. विद्यापीठाचे संलग्निकरण देण्याबाबत आवश्यक असलेली पुढील कार्यवाही विद्यापीठांनी करण्यापूर्वी शासनाच्या मान्यतेबाबतचे आदेश शासनाच्या संकेतस्थळावर अवलोकन केल्याशिवाय व विभागीय सहसंचालकाचे प्रमाणपत्र मिळाल्याशिवाय संलग्नता देण्याची प्रक्रिया सुरु करु नये. विद्यापीठांनी संलग्नतेबाबतचा पूर्तता अहवाल संचालक, उच्च शिक्षण, महाराष्ट्र राज्य, पुणे व संबंधित विभागीय सहसंचालक, उच्च शिक्षण, महाराष्ट्र राज्य यांना पाठवावा.

३. संबंधीत विद्यापीठांनी व विभागीय सहसंचालकांनी नवीन तुकडयांबाबतचा नियतकालिक आढावा घेवून जर तुकडयांमध्ये मंजूर विद्यार्थी संख्येच्या ५० टक्के किंवा त्यापेक्षा कमी विद्यार्थ्यी दिसून आल्यास सदर नवीन विद्याशाखा रद्द समजून तसे शासन व विद्यापीठाच्या माहितीने विभागीय सहसंचालकांनी आदेश काढावेत.

४. हे आदेश, राज्य शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेत स्थळावर उपलब्ध असून त्याचा संगणक संकेतांक २००९०८३११७४५४८००१ आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

( सदाशिव शिवदास )
सहसचिव, महाराष्ट्र शासन

प्रत,

१) कुलसचिव, सर्व अकृषी विद्यापीठे, महाराष्ट्र राज्य,
२) संचालक, उच्च शिक्षण, महाराष्ट्र राज्य, पुणे
३) सर्व विभागीय सहसंचालक, उच्च शिक्षण, महाराष्ट्र राज्य,
४) संबंधित संस्था,
५) निवड नस्ती (मशि-४)